पोलीस उप अधिक्षक, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर नियुक्ती देण्याबाबत
**श्री आनंद आप्पासाहेब भोईटे.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन आदेश क्र.सांसवि -१०१७/प्र.क्र.९४/का.१६,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०१.०९.२०१७

**संदर्भ :-** विधि व न्याय विभाग, शा.नि.क्र.सासंवि १०१६/४०९/प्र.क्र.६६/का.१६, दि.३०.०५. २०१७.

**प्रस्तावना:-**

श्री साईबाबा महासमाधी शताब्दी महोत्सव, सन २०१७ - १८ च्या पार्श्वभूमीवर श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी येथे शताब्दी कक्ष स्थापन करण्यासाठी श्री साईबाबा संस्थानच्या आस्थापनेवर संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दि ३१.३.२०१९.पर्यंत तात्पुरत्या स्वरुपातील अस्थायी पदे निर्माण करण्यात आली आहेत. शताब्दी काळात शिर्डीत होणा-या गर्दीचे नियंत्रण करुन महोत्सव कालावधीतील कामात सुसूत्रता आणि समन्वय राखणे तसेच आपत्ती व्यवस्थापन यशस्वीरीत्या करण्याकरीता उपरोक्त शासन निर्णयान्वये पोलीस उप अधिक्षक (रु.१५६००-३९१०० + ग्रे.पे.५४००) संवर्गातील देखील एक अस्थायी पद निर्माण करण्यात आले आहे. सक्षम प्राधिकारी यांनी केलेल्या शिफारशीनुसार सदर पदावर प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश-**

श्री. आनंद अप्पासाहेब भोईटे, उप विभागीय पोलीस अधिकारी, ग्रामीण उपविभाग, अहमदनगर यांची श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्या आस्थापनेवरील पोलीस उप अधिक्षक (रु.१५६००-३९१००+ग्रे.पे.५४००) या तात्पुरत्या स्वरुपातील अस्थायी पदावर प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्री. आनंद अप्पासाहेब भोईटे यांच्या प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्तीचा कालावधी पोलीस उप अधिक्षक, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर ते रुजू झाल्याच्या दिनांकापासून दि.३१.३.२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी राहील.

३. श्री. आनंद भोईटे, पोलीस उप अधिक्षक यांच्या सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन ......... या कालावधीतील प्रदाने)नियम, १९८१ मधील तरतुदी लागू राहतील तसेच सदर कालावधीतील त्यांच्या सेवाविषयक बाबींचे नियंत्रण विधि व न्याय विभागाद्वारे करण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०४१६५८४९८०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rakhi V. Chavan

Digitally signed by Rakhi V. Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, cn=Rakhi V. Chavan
Date: 2017.09.04 16:48:02 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, विधि व न्याय विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
(श्री. आनंद भोईटे, पोलीस उप अधिक्षक, अहमदनगर यांना पोलीस उप अधिक्षक, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या पदावर रुजू होण्यासाठी तातडीने कार्यमुक्त करण्याची विनंती करण्यात येत आहे.)
४. प्रधान महालेखापाल १ / २ ( लेखा व अनज्ञेयता ), मुंबई / नागपूर.
५. पोलीस अधिक्षक, अहमदनगर
६. अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्त व्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर
८. श्री.आनंद अ.भोईटे, पोलीस उपअधिक्षक, अहमदनगर
९. निवड नस्ती/ का-१६.